**खरीप हंगाम सन २०२४ करीता युरिया व डीएपी खताचा संरक्षित साठा (Buffer Stock) करण्यासाठी आलेल्या खर्चाच्या प्रतिपूर्तीसाठी निधी वितरीत करण्यास वित्तीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : कृवपदुम-२८/३/२०२४-MAG-१७A**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, विस्तार, मुंबई ४०००३२
दिनांक :- २७ मार्च, २०२५

<u>वाचा:-</u>

१. कृषि विभागाचा शासन निर्णय क्र. खसंसा ३५२४/ प्र.क्र. ६९/१७-अे, दि. १५ मार्च, २०२४.
२. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ/ खते/ गुनि ३-४/बफर /२४-२५/ ४३०१/२०२४, दि. २५ फेब्रुवारी, २०२५.

<u>प्रस्तावना:</u>

राज्यात खरीप २०२४ मध्ये युरिया खताचा १.५० लाख मे. टन व डिएपी खताचा ०.२५ लाख मे. टन संरक्षित साठा (Buffer Stock) करण्यास वाचा क्र. १ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. सदर प्रयोजनार्थ दि.विदर्भ को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन लिमिटेड, नागपूर, दि महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन लिमिटेड, मुंबई आणि महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ, मुंबई यांना “नोडल एजन्सी” म्हणून नियुक्त करण्यात आले आहे. या नोडल एजन्सींना संरक्षित साठा करण्यास आलेल्या खर्चाचा तपशील वाचा क्र. २ अन्वये कृषि आयुक्तालयाने सादर केला आहे.

या योजनेसाठी आर्थिक वर्ष २०२४-२५ करीता लेखाशिर्ष २४०१८२०८ मध्ये रु. ३०.०० कोटी इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आलेली आहे. वित्त विभागाच्या दिनांक १२ फेब्रुवारी, २०२५ मधील मार्गदर्शक सूचनांनुसार निधी वितरण करण्याबाबत सूचना देण्यात आल्या आहेत. त्याअनुषंगाने खरीप २०२४ मध्ये युरिया खताचा व डिएपी खताचा संरक्षित साठा (Buffer Stock) करण्यास आलेल्या खर्चाची प्रतिपूर्ती करण्यासाठी नोडल एजन्सींना निधी उपलब्ध करण्यास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यात खरीप २०२४ मध्ये युरिया खताचा १.५० लाख मे. टन व डिएपी खताचा ०.२५ लाख मे. टन संरक्षित साठा (Buffer Stock) करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली होती. सदर प्रयोजनार्थ दि.विदर्भ को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन लिमिटेड, नागपूर, दि महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन लिमिटेड, मुंबई आणि महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ, मुंबई यांना "नोडल एजन्सी" म्हणून नियुक्त करण्यात आले होते. प्रत्यक्षात, सदर नोडल एजन्सींनी युरिया व डिएपी चा अनुक्रमे १२०२९५.५०१ मे.टन व १८११३.९०० मे.टन इतका साठा केला आहे. सदर योजनेसाठी सन २०२४-२५ मध्ये लेखाशिर्ष २४०१ ८२०८ अंतर्गत एकूण ३०.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत केलेला आहे. सदर निधीपैकी रु.२०,३६,७७,६९६/- (रु.वीस कोटी छत्तीस लक्ष सत्त्यात्तर हजार सहाशे शहाण्णव फक्त) इतका निधी वरील नोडल एजन्सींना खतांचा संरक्षित साठा करण्यासाठी येणाऱ्या खर्चाची प्रतिपूर्ती करण्याकरीता वितरीत करण्यास कृषि आयुक्तालय, पुणे यांना वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर बाबीकरीता होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा :-

**मागणी क्रमांक : डी-३**
**१०५, खते व रासायनिक खते,**
**(००) (००) (३१) डीएपी व मिश्र रासायनिक खतांचा पुरवठा**
**करण्यासाठी येणारा खर्च भागविण्याकरिता अर्थसहाय्य (कार्यक्रम)**
**३३, अर्थसहाय्य ( २४०१ ८२०८)**

३. कृषि आयुक्तालय स्तरावर आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे हे योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणून तसेच, सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे हे आहरण व संवितरण अधिकारी राहतील.

४. संरक्षित साठा करण्यासाठी येणाऱ्या खर्चाची प्रतिपूर्ती करताना प्रचलित शासन निर्णय/ नियम/ परिपत्रक यामधील तरतूदीनुसार अंमलबजावणी करावी.

५. सदर निधी दि.३१ मार्च, २०२५ पूर्वी खर्च करण्यात यावा. सदर निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च न होता त्यांच्या अधिनस्त क्षेत्रीय अधिकारी/मंडळे/महामंडळे यांच्या बँक खात्यात, स्वीय प्रपंची खात्यात अथवा शासकीय लेख्याबाहेर ठेवता येणार नाही. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/ अधिकारांचा भंग होणार नाही, याबाबत आयुक्त (कृषि) यांनी दक्षता घ्यावी.

६. सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र निधी वितरीत केल्यानंतर ३ महिन्यात शासनास सादर करावे.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्र. १०२/ २०२५ /व्यय-१, दि. २५.३.२०२५ अन्वये दिलेल्या निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२७१०४४२७९६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJESH HANMANT PADHYE

Digitally signed by RAJESH HANMANT PADHYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=dc153114bd075a6b1e46ab4a44e410949fb23ba3456957504838af4a35a9b324, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=A4545183145BB7CEBA2B281345FCFBF965C36542037F7724F53C8F43E1DBA1D4, cn=RAJESH HANMANT PADHYE
Date: 2025.03.27 10:45:08 +05'30'

**( राजेश पाध्ये )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
४. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ, गोरेगाव, मुंबई
७. व्यवस्थापकीय संचालक, दि.विदर्भ को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन लिमिटेड, नागपूर.
८. व्यवस्थापकीय संचालक, दि.महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन लिमिटेड, मुंबई.
९. प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर
१०.उप सचिव (नि.व गु.नि.), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.कृषि संचालक (नि.व गु.नि.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२.कृषि सहसंचालक (आस्थापना), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१३.सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१४.सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी / कृषि विकास अधिकारी.
१५.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१६.उप संचालक (खते), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१७.प्रशासन अधिकारी, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१८. वित्त विभाग (व्यय-१, अर्थसंकल्प -१३ ), मंत्रालय, मुंबई
१९.वित्त विभाग (वित्तीय सुधारणा), मंत्रालय, मुंबई
२०.कार्यासन (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२१. कार्यासन-१७-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई (निवडनस्ती)